आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ यावर्षत कृषिपंप ग्राहकांना वीज दरात सवलत या योजनेसाठी निधी वितरीत करण्याबाबत.
(लेखाशिर्ष २८०१ ५६१४)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१/प्र.क्र. ९/कार्यासन ६**
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२
दिनांक : -३१ मार्च,२०२२.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१, दि.१४.१०.२०२१, दि.०३.०२.२०२२ व दि.१७.०३.२०२२.
२) आदिवासी विकास विभाग, शा.नि. समक्रमांक, दि.२९.११.२०२१ व दि.१८.०२.२०२२.
३) शासन ज्ञापन, आदिवासी विकास विभाग, क्र.बीयुडी-२०२१/प्र.क्र.३३/का-६,दि.३१.०३.२०२२.
४) उद्योग, उर्जा व कामगार विभागाची नस्ती क्र. पुरमा-२०२२/प्र.क्र.१०/उर्जा-३.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत ऊर्जा विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या अनुसूचित जमाती घटकांना कृषिपंप ग्राहकांना वीज दरात सवलत या योजनेसाठी सन २०२१-२२ या वर्षात अर्थसंकल्पित एकूण रू.३५०.०० कोटी इतका निधी ऊर्जा विभागास वितरीत करण्यात आलेला आहे. योजनेंतर्गत अनुसूचित जमाती प्रवर्गाच्या कृषि पंप धारकांना दिलेल्या सवलतीपोटी चालू वर्षाच्या मार्च अखेरचे दायित्व उपलब्ध करून देण्याच्या अनुषंगाने उर्वरीत प्रलंबीत रु.४२.७९ कोटी वाढीव निध पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध करून देण्यास संदर्भाधीन क्र.३ येथील नस्तीवर वित्त विभागाची मान्यता प्राप्त झाली आहे. यास अनुसरून वाढीव निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ या वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतुदींमधून मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष २८०१, वीज या मुख्य लेखाशीर्षाखाली अनुसूचित जमाती घटकाकरीता कृषिपंप ग्राहकांना वीज दरात सवलत या योजनेसाठी वित्त विभागाच्या मान्यतेस अनुसरुन खालीलप्रमाणे वाढीव निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

**(रु.कोटीत)**

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष | बाब | सन २०२१-२२ सुधारीत अंदाज | सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेला वाढीव निधी |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| कृषिपंप ग्राहकांना वीज दरात सवलत | २८०१ ५६१४ | ३३,अर्थसहाय्य | ३५०.०० | ४२.७९ |

२. उपरोक्त प्रमाणे **एकूण रु.४२.७९ कोटी (अक्षरी रुपये बेचाळीस कोटी एकोणऐंशी लाख फक्त)** इतका निधी प्रशासकिय विभागप्रमुख म्हणून प्रधान सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. प्रकरणी विभागप्रमुख / नियंत्रण अधिकारी यांनी सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील शासन आदेशातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

३. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतून झालेल्या झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी व निधी उपयोगिता प्रमाणपत्रासह पुढील निधी वितरणासाठी प्रस्ताव सादर करावा.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतुन फक्त आदिवासी लाभार्थ्यांनाच लाभ देण्याबाबत दक्षता घेण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.४०९/व्यय-१४, दि.३०.०३.२०२२ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३३११६३५५९४५२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAVINDRA D AUTE

Digitally signed by RAVINDRA D AUTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, pseudonym=C4ECFFC229308BD3BD1E334FAC78848FBF7F7613, serialNumber=CA98EFAC317508AB9B5820B47955BC1BABB173F20D25ABD816ED91A9B6B0F16C, cn=RAVINDRA D AUTE
Date: 2022.03.31 21:24:08 +05'30'

(रविंद्र दि.औटे)
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
५. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
६. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७. निवड नस्ती (का-६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.